**पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे अधीनस्त**
**नवीन दोन उपविभाग कार्यान्वित करणेबाबत..**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अेपीओ ०११५/प्र. क्र. २४७/पोल-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १९ ऑगस्ट २०१५

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः अेपीओ ०२८९/४९/प्र. क्र. ९/पोल-३, दि.२८.९.१९९०**
2) **शासन निर्णय क्रमांकः रापोसे-१३०८/प्र. क्र. २२८/पोल-१अ, दि.२२.१०.२००९**
3) **पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे क्र. पशा/कक्ष-४/पुनर्रचना/७२२२/२०१५, दि.३.६.२०१५**
4) **पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.पोमसं/२६-अ/४७/पोआ नाशिक शहर/१६७/२०१५, दि.२५.६.२०१५ व क्र. पोमस/२६-अ/४७/नाशिक शहर/१६७/२०१५, दि.२३.७.२०१५**

**प्रस्तावना -**

सन १९९० साली नाशिक पोलीस अधीक्षक कार्यक्षेत्राचे विभाजन होवून नाशिक शहरासाठी संदर्भाधीन क्र. १ वरील दि.२९.९.१९९० च्या शासन निर्णयान्वये स्वतंत्र पोलीस आयुक्तालय स्थापन करण्यात आले. तेव्हापासून पोलीस आयुक्त, नाशिक शहर आस्थापनेवर परिमंडळ-१ व त्याच्या अंतर्गत विभाग-१ व विभाग-२ कार्यरत होते. त्यानंतर विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ वरील दि.२२.१०.२००९ च्या शासन निर्णयान्वये पोलीस उप आयुक्त परिमंडळ-२ नाशिक शहर असे पोलीस उपायुक्त-०१ पद मंजूर करण्यात आले होते. त्यानुसार परिमंडळ-२ कार्यान्वित झाले असून पोलीस उपायुक्त, परिमंडळ-१ यांचे अंतर्गत विभाग-१ व पोलीस उपायुक्त परिमंडळ-२ यांचे अंतर्गत विभाग-२ असे दोनच विभाग सध्या कार्यरत आहेत.

नाशिक पोलीस आयुक्तालयांतर्गत पोलीस उपायुक्त परिमंडळ-१ व पोलीस उपायुक्त परिमंडळ-२ यांचे तसेच सहाय्यक पोलीस आयुक्त विभाग-१ व विभाग-२ यांचे दर्जा व अधिकार यांच्याच मोठया प्रमाणात भिन्नता असून देखील त्यांचे कार्यक्षेत्र एकच आहे. प्रशासकीय दृष्टीकोनातून परिमंडळाचे कमीतकमी दोन विभागांमध्ये विभाजन होणे आवश्यक असल्यामुळे दोन नवीन विभाग निर्माण करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे अधीनस्त सद्यस्थितीमध्ये खालीलप्रमाणे परिमंडळ व विभाग कार्यरत आहेत;-

| सद्यस्थितीमध्ये आस्तित्वात असलेले परिमंडळ व विभाग | | | |
|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **परिमंडळाचे नांव** | **विभागाचे नांव** | **पोलीस ठाणेचे नांव** |
| १ | परिमंडळ-१ | विभाग-१ | १) भद्रकाली, २) पंचवटी, ३) सरकारवाडा, ४) गंगापूर, ५) आडगांव |
| २ | परिमंडळ-२ | विभाग-२ | १) सातपूर, २) अंबड, ३) इंदिरानगर, ४) उपनगर, ५) नाशिक रोड, ६) देवळाली कॅम्प |

२. सिंहस्थ कुंभमेळा, नवीन पोलीस ठाण्यांची निर्मिती आणि पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे अधीनस्त भाग-१ ते ५ मधील गुन्हयांचे प्रमाण विचारात घेवून तसेच प्रशासकीय दृष्टीकोनातून पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे अधीनस्त खालीलप्रमाणे परिमंडळ व विभाग कार्यान्वित करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| परिमंडळाचे नांव | विभागाचे नांव | पोलीस ठाणेचे नांव |
|---|---|---|
| परिमंडळ-१ | विभाग-१ | १) पंचवटी, २) आडगांव, ३) म्हसरुळ |
| | विभाग-२ | १) भद्रकाली, २) सरकारवाडा, ३)गंगापूर, ४) मुंबईनाका |
| परिमंडळ-२ | विभाग-३ | १) सातपुर, २) अंबड, ३) इंदिरानगर |
| | विभाग-४ | १) उपनगर, २) नाशिकरोड, ३) देवळाली कॅम्प |

३. सदरहू नवीन विभागांचे कामकाज हे पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे अधीनस्त असलेल्या मंजूर सहाय्यक पोलीस आयुक्त यांचेद्वारे पार पाडण्यात यावे. भविष्यात विषयांकीत प्रकरणी पदनिर्मिती करणे आवश्यक झाल्यास, पदनिर्मितीवर शासनाने घातलेली बंदी उठविल्यानंतर आणि पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अधीनस्त पोलीस दलातील सर्व पदांचा आढावा अंतिम झाल्यानंतरच विचारात घेण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१९१५१११०१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.08.19 15:15:12 +05'30'

**(द. ह. कदम)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक
३. पोलीस आयुक्त, नाशिक शहर
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
८. गृह विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कक्ष अधिकारी
९. निवडनस्ती, पोल-३